**अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, अमरावती यांच्या अधिनस्त जिल्हा प्रयोगशाळा, यवतमाळ, बुलढाणा व वाशिम स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२२/प्र.क्र.४९/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०४ मे, २०२३.

**संदर्भ:-** मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे क्र.का-४(२)/संकीर्ण/ प्रयोगशाळा स्थापन/२०२२/२२५७, दि.२५ मे, २०२२ व क्र.८७३ व ८७६, दि.२२/०२/२०२३ रोजीची पत्रे.

**प्रस्तावना :-**

अमरावती जिल्ह्यातील बांधकाम प्रकल्पांची गुणवत्ता तपासण्यासाठी, दर्जेदार कामे होण्यासाठी तसेच कामावर गुणनियंत्रण ठेवण्यासाठी आवश्यक व नियमित बांधकामाचे चाचणी निष्कर्ष तातडीने देता यावे याकरीता अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, अमरावती यांच्या अधिनस्त जिल्हा प्रयोगशाळा, यवतमाळ, बुलढाणा व वाशिम स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती अंतर्गत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ अंतर्गत असलेले मार्ग प्रकल्प उपविभाग, यवतमाळ हे कार्यालय शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही या अटींच्या अधीन राहून **जिल्हा प्रयोगशाळा, यवतमाळ** म्हणून कार्यान्वित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती अंतर्गत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला अंतर्गत असलेले सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, खामगाव व जागतिक बँक प्रकल्प उपविभाग, अकोला ही कार्यालये शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही या अटींच्या अधीन राहून अनुक्रमे **जिल्हा प्रयोगशाळा, बुलढाणा व जिल्हा प्रयोगशाळा, वाशिम** म्हणून कार्यान्वित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. जिल्हा प्रयोगशाळा, यवतमाळ, बुलढाणा व वाशिम या अनुक्रमे क्षेत्रिय प्रयोगशाळा, यवतमाळ व क्षेत्रिय प्रयोगशाळा, बुलढाणा यांच्या इमारतीत कार्यरत राहतील. तसेच जिल्हा प्रयोगशाळा वाशिम ही सार्वजनिक बांधकाम विभाग कार्यालय, वाशिम येथील उपलब्ध इमारतीत कार्यरत राहील.

३. जिल्हा प्रयोगशाळा, यवतमाळ, बुलढाणा व वाशिम या प्रयोगशाळेमार्फत शासकीय बांधकामासंबंधित चाचण्यांबरोबर विहित शुल्क आकारणी करुन खाजगी बांधकाम चाचण्या करुन घेण्यास देखील मान्यता देण्यात येत आहे.

४. जिल्हा प्रयोगशाळा, यवतमाळ, बुलढाणा व वाशिम या प्रयोगशाळा अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, अमरावती यांच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखाली असणार आहेत. त्यामुळे या जिल्हा प्रयोगशाळेत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासून अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, अमरावती या कार्यालयामार्फत अदा करण्यात यावे. तसेच क्षेत्रिय प्रयोगशाळा, यवतमाळ, बुलढाणा व वाशिम येथील संपूर्ण उपलब्ध यंत्र सामग्री जिल्हा प्रयोगशाळेकरीता वापरण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

५. जिल्हा प्रयोगशाळेसाठी उपलब्ध करुन दिलेले प्रशिक्षित अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्या त्यांच्या सदर कार्यरत पदावरील पदावधी पूर्ण होण्यापूर्वी करण्यात येऊ नयेत, जेणेकरुन शासनाचा प्रशिक्षणावरील वेळ व खर्च वाया जाणार नाही.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०५०४१६०४३४५८१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO

Digitally signed by SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=1fbca76d11ad25e383a0e28da215f01e12183c1b565ddd29aaf1ffbfad8e9e9c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6F385E4139AB144CAAF92B440B55068479C3789EA50EC85EB7A16B7C932CB397, cn=SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
Date: 2023.05.04 16:13:04 +05'30'

**( विक्रमसिंह प्र. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.

२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, यवतमाळ व अकोला.

३) अधीक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, अमरावती.

**प्रत :-**

१) मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) अपर मुख्य सचिव (सा.बां.)/ सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

३) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, यवतमाळ, बुलढाणा व वाशिम

५) कार्यासन अर्थसंकल्प-३/ सेवा-१/२/३/४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) निवडनस्ती प्रशासन-१.